जिल्हानिहाय जात प्रमाणपत्र पडताळणी समित्या स्थापन करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

### शासन निर्णय क्रमांकः सकआ-२०१४/ प्र.क्र.२१७ (१) /आस्था-२

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक: २ मार्च, २०१५

**वाचा :**

१) शासन निर्णय महसूल व वन विभाग, क्र. आरसीटी-१०/०८/२०१२/ प्र.क्र.१०९/ ई-१, दि. २२/११/२०१३

२) शासन निर्णय क्र.सकआ-२०१४/प्र.क्र.१७३/आस्था-२/दि.९/६/२०१४.

## शासन निर्णय :

उपरोक्त संदर्भाधिन दि.२२/११/२०१३ च्या शासन निर्णयान्वये अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गातील व्यक्तींसाठी सध्याच्या विभागीय स्तरावरील जात प्रमाणपत्र पडताळणी समिती निरसित करुन प्रत्येक जिल्ह्यासाठी जात प्रमाणपत्र पडताळणी समिती स्थापन करण्याचा निर्णय घेण्यात आलेला असून, या समितीचे पदसिध्द अध्यक्ष म्हणून त्या-त्या जिल्ह्याच्या जिल्हाधिकारी कार्यालयातील अपर जिल्हाधिकाऱ्यांचे पद श्रेणीवाढ करुन ते निवडश्रेणीमध्ये रुपांतरीत करण्याचा निर्णय घेण्यात आला होता. त्यानुसार शासन संदर्भीय दि. ९ जून २०१४ च्या शासन आदेशान्वये ३५ समित्या कार्यन्वित करण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. जात प्रमाणपत्र पडताळणी समित्यांच्या कार्यपध्दती संदर्भात श्रीमती माधुरी पाटील प्रकरणी मा. सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या मार्गदर्शक तत्वाप्रमाणे तसेच उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद येथील याचिका क्रमांक ३४४३/९० व १२७९/२००३ मध्ये दिलेल्या निर्देशाप्रमाणे जात प्रमाणापत्र पडताळणी समिती ही स्वतंत्र समिती असणे आवश्यक असल्याने तसेच दरम्यानच्या कालावधीत पालघर हा नवीन जिल्हा निर्माण झाला असल्याने सदर नवीन जिल्हा विचारात घेऊन एकूण ३६ जिल्हयांकरिता खालीलप्रमाणे जिल्हानिहाय समिती स्थापन करण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १. | अतिरिक्त जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) / समकक्ष अधिकारी, सामाजिक न्याय विभाग | --- | अध्यक्ष |
| २. | उपायुक्त, समाजकल्याण | --- | सदस्य |
| ३. | सहाय्यक आयुक्त व तत्सम, समाज कल्याण | --- | सदस्य सचिव तथा संशोधन अधिकारी |

२. सदर समित्यांवरील अध्यक्षांची पदे अतिरिक्त जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) या संवर्गातील अधिकाऱ्यांमधून प्रतिनियुक्तीने भरण्यात येतील. मात्र जेथे सामाजिक न्याय विभागाचे समकक्ष अधिकारी बदलीने / पदोन्नतीने उपलब्ध होतील तेथे त्यांची समितीच्या अध्यक्ष पदावर नियुक्ती करण्यात येईल.

३. वरील समित्यांसाठी आवश्यक असणारी अध्यक्ष, सदस्य, सदस्य सचिव तथा संशोधन अधिकारी तसेच अन्य कर्मचारी वर्ग ही पदे सामाजिक न्याय विभागाच्या आस्थापनेवर नव्याने निर्माण करावयाची आहेत. त्यासाठीचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन आहे. प्रस्तावित पद निर्मितीस काही कालावधी लागण्याची शक्यता आहे. याकरीता सध्याच्या १५ समित्यांवरील पदे व नव्याने निर्माण करावयाची जिल्हास्तरावरील पदे विचारात घेऊन खालील प्रमाणे तात्पुरत्या स्वरुपात व्यवस्था करण्यात येत आहे.

१) सद्य: स्थितीत अस्तित्वात असलेल्या १५ जाती प्रमाणपत्र पडताळणी समित्यांपैकी ९ समित्यांवर अतिरिक्त जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) तसेच मंत्रालयीन स्तरावरील सह सचिव या संवर्गातील अधिकारी कार्यरत आहेत. तथापि उपरोक्त पार्श्वभूमी विचारात घेऊन सामाजिक न्याय विभागातून अध्यक्ष पदासाठी बदलीने / पदोन्नतीने उपलब्ध होणारे अधिकारी वगळून उर्वरित पदे महसूल व वन विभागातून प्रतिनियुक्तीने भरण्यात यावीत.

२) सध्याच्या १५ समित्यांवरील अध्यक्ष हे ज्या समितीवर कार्यरत आहेत, त्या समितीच्या कार्यकक्षेतील जिल्हानिहाय समितीचे अध्यक्ष म्हणुन काम पहातील.

३) सध्याच्या १५ समित्यांवरील सदस्य व संशोधन अधिकारी हे सध्या ज्या ठिकाणी त्यांचे मुख्यालय आहे, त्या ठिकाणी जिल्हास्तरावरील समित्यांवर वर्ग होतील व ते तेथे कार्यरत राहतील . तसेच अन्य कर्मचाऱ्यांचे मुख्यालय हे ज्या जिल्ह्याच्या ठिकाणी आहे, त्याच जिल्हा समितीवर वर्ग होतील व ते तेथे कार्यरत राहतील. मात्र नागपूर येथील समिती क्र.२ येथील अधिकारी / कर्मचाऱ्यांचे मुख्यालय, वर्धा हे राहील व तेथील जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समितीवर वर्ग होतील व ते तेथे कार्यरत राहतील.

४) जिल्हानिहाय जात प्रमाणपत्र पडताळणी समित्यांच्या दक्षता पथकासाठी पोलीस उपअधिक्षक व पोलीस निरीक्षक ही पदे नियमितरित्या गृह विभागाकडून उपलब्ध होईपर्यंत, सध्या अस्तित्वात असलेल्या १५ समित्यांकडील दक्षता पथकातील अधिकारी / कर्मचारी हे सध्याच्या मुख्यालयी असलेल्या जिल्हास्तरावरील समित्यांवर वर्ग होतील व ते तेथे कार्यरत राहतील.

५) दक्षता पथकातील अधिकाऱ्यांनी सध्याच्या त्यांना नेमुन दिलेल्या कार्यक्षेत्रानुसार काम करावे व त्या-त्या जिल्ह्यातील समित्यांना त्या - त्या जिल्हयाचा आपला अहवाल द्यावा. जिल्हानिहाय समित्यांवर नियमितपणे दक्षता पथकाचे अधिकारी उपलब्ध होताच त्या संबंधित जिल्हयातील जात प्रमाणपत्र देणाऱ्या उपविभागीय अधिकारी/तहसिलदार यांना आवश्यकता वाटल्यास ते त्या - त्या जिल्हयातील दक्षता पथकाकडून अहवाल घेऊ शकतील. त्यानुषंगाने जात प्रमाणपत्र पडताळणी समितीच्या दक्षता पथकाने संबंधित जिल्हयातील जात प्रमाणपत्र देणाऱ्या उपविभागीय अधिकारी/तहसिलदार यांना आवश्यक ती मदत करावी.

६) अन्य २१ जिल्ह्याच्या ठिकाणावरील सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण हे पुढील आदेश होई पर्यंत स्थानिक जिल्हास्तरावरील समितीचे सदस्य सचिव म्हणून काम पाहतील.

७) २१ जिल्हास्तरावरील प्रत्येक समितीसाठी संबंधित प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण यांनी विभागीयस्तरावरील व जिल्हास्तरावरील तसेच जिल्ह्यातील उपलब्ध कर्मचाऱ्यांमधून कामकाज व्यवस्थेअंतर्गत ३ लिपिक व १ वरिष्ठ लिपिकांच्या सेवा उपलब्ध करुन द्याव्यात. तसेच जिल्हा समित्यांसाठी त्या-त्या जिल्ह्याच्या सहाय्यक आयुक्त कार्यालयातील लघुलेखकाच्या सेवा उपलब्ध करुन घ्याव्यात.

८) समितीचे मुख्यालय सध्याच्या सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण यांचे कार्यालयात राहील. तसेच ज्या सामाजिक न्याय भवनाचे बांधकाम पुर्ण होऊन तेथे सहायक आयुक्त, समाज कल्याण, यांचे कार्यालय स्थलांतरित होऊन कार्यरत झाले आहे त्या सामाजिक न्याय भवनात जिल्हास्तरीय जात

प्रमाणपत्र पडताळणीचे कार्यालय स्वतंत्रपणे सुरु करावे. याबाबत सर्व सहायक आयुक्त समाज कल्याण यांनी कार्यवाही करावी.

९) नविन २१ समित्यांच्या सदस्य या पदाचा अतिरिक्त कार्यभार अन्य उपायुक्त, समाजकल्याण यांचेकडे सोपविण्याबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येत आहेत.

१०) नविन जिल्हास्तरावरील समित्या स्थापन करण्यासाठी आवश्यक साधन सामग्री त्या -त्या समितीस महासंचालक डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांनी उपलब्ध करुन द्यावी.

११) जिल्हास्तरावरील जात प्रमाणपत्र पडताळणी समित्यांचे नियंत्रण अधिकारी म्हणून समितीचे अध्यक्ष तर सर्व जिल्हा स्तरावरील समित्यांचे समन्वयाचे कामकाज महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे हे काम पाहतील.

१२) सध्याच्या १५ समित्यांच्या आस्थापनेवरील पदे तसेच नवनिर्मित २१ जिल्हास्तरावरील समित्यांसाठी निर्माण करण्यात येणाऱ्या पदांबाबतचे एकत्रित आदेश यथावकाश निर्गमित करण्यात येतील. त्यानुषंगाने समितीच्या अध्यक्षांची पदे निर्माण करण्याबाबतची कार्यवाही महसूल व वन विभागाने करावी. तसेच जिल्हानिहाय जात प्रमाणपत्र पडताळणी समित्यांच्या दक्षता पथकासाठी पोलीस उपअधिक्षक व पोलीस निरीक्षक ही पदे निर्माण करण्याची कार्यवाही गृह विभागाने करावी. समितीवरील इतर पदे निर्माण करण्याबाबतची पुढील कार्यवाही सामाजिक न्याय विभागाकडून करण्यात येईल.

१३) जिल्हा स्तरावरील जात प्रमाणपत्र पडताळणी समित्यांची कामकाजाची संपूर्ण जबाबदारी ही समितीच्या अध्यक्षांची राहील.

१४) जिल्हास्तरावरील जात पडताळणी समित्यांचे कार्यालय प्रमुख म्हणून समितीचे अध्यक्ष यांना घोषित करण्यात येत आहे. तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून समितीचे सदस्य सचिव यांना घोषित करण्यात येत आहे.

१५) जिल्हास्तरावरील समित्यांचे अध्यक्ष ,सदस्य व सदस्य सचिव यांचे गोपनीय अहवाल महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे हे प्रतिवेदीत करतील तर सचिव (सा.न्याय) हे या गोपनीय अहवालाचे पुनर्विलोकन करतील. तथापि, जिल्हानिहाय समितीवर नियमित सदस्य व सदस्य सचिव नियुक्त होईपर्यंत जिल्हास्तरावरील समित्यांच्या सदस्य व सदस्य सचिव पदांचा अतिरिक्त कार्यभार सोपविलेल्या उपायुक्त तसेच सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण/जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांचे गोपनीय अहवाल त्यांच्या मुळ पदाशी संलग्न असलेल्या गोपनिय अहवालाबाबतच्या व्यवस्थेनुसारच असतील.

१६) जिल्हास्तरावरील समित्यांच्या दक्षता पथकाकडील पोलीस उपअधिक्षक व पोलीस निरीक्षक यांचे गोपनीय अहवाल संबंधित समितीचे अध्यक्ष प्रतिवेदीत करतील तर महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे सदर गोपनीय अहवालाचे पुनर्विलोकन करतील. जिल्हानिहाय समित्यांकडील वर्ग-३ कर्मचाऱ्यांचे गोपनिय अहवाल समितीचे सदस्य सचिव प्रतिवेदीत करतील तर समितीचे सदस्य हे पुनर्विलोकन अधिकारी असतील.

या आदेशाची तातडीने अंमलबजावणी करण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०३०२१७१२१००५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Uke Ujjwal

Digitally signed by Uke Ujjwal
DN: c=IN, o=ALL INDIA SERVICE, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uke Ujjwal
Date: 2015.03.02 17:21:50 +05'30'

(उज्ज्वल उके)
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई ४०००0६
मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२
मा.मुख्यसचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२
सर्व विभागीय आयुक्त / सर्व जिल्हाधिकारी
अतिरिक्त मुख्य सचिव, (गृह ),गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२
अ.मु.स. सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२
प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२
आयुक्त,समाजकल्याण,पुणे
आयुक्त, अपंग कल्याण,पुणे
संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, पुणे
महांसचालक, डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
सर्व अध्यक्ष, विभागीय जात प्रमाणपत्र पडताळणी समिती
सर्व सदस्य, विभागीय जात प्रमाणपत्र पडताळणी समिती
सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण
सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण
सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद
मा.मंत्री (सा.न्याय), यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री (महसूल), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२
मा.मंत्री (गृह), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई ४००० ३२
मा.राज्यमंत्री (महसूल), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२
मा.राज्यमंत्री (गृह), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२
मा.राज्यमंत्री (सा.न्या) यांचे ,खाजगी सचिव
सहसचिव (कार्या.मावक), यांचे स्वीय सहायक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय, मुंबई ३२.
सामान्य प्रशासन विभाग, (कार्यासन १२), मंत्रालय, मुंबई
महसूल व वन विभाग (कार्या ई-१), मंत्रालय, मुंबई ४०००३२
निवड नस्ती (आस्था-२)